**भूतपूर्व दुय्यम सेवा निवड मंडळाच्या कक्षेतील नामनिर्देशनाच्या कोट्यातील गट-क व गट-ब (अराजपत्रित) संवर्गातील रिक्त पदभरतीकरिता धडक कालबद्ध कार्यक्रम २०१८.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: प्रानिमं १२१८/प्र.क्र.२७/१३-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ०२ जुलै, २०१८.

**संदर्भ: -**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग (माहिती तंत्रज्ञान), क्र.मातंसं-८८/२७/२०१६-DIR IT (MH), दिनांक १९ सप्टेबर, २०१७

२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र. प्रानिमं-१२१८/प्र.क्र.२७/१३-अ, दिनांक १४ मार्च, २०१८

३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. संकीर्ण-२०१८/प्र.क्र.२०/आ.पु.क., दिनांक १६ मे, २०१८

४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. प्रानिमं-१२१६/प्र.क्र.६५/१३-अ, दिनांक १३ जून, २०१८.

**प्रस्तावना: -**

संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये, भूतपूर्व दुय्यम सेवा निवड मंडळाच्या कक्षेतील नामनिर्देशनाच्या कोट्यातील गट-ब (अराजपत्रित) व गट-क पदे सरळसेवेने भरताना अनुसरावयाची कार्यपद्धती विहित करण्यात आली आहे. त्यानुसार जिल्हास्तरीय पदे भरण्याकरीता जिल्हाधिकाऱ्यांच्या अध्यक्षतेखाली जिल्हा निवड समित्या, प्रादेशिकस्तरीय पदे भरण्याकरीता प्रादेशिक विभाग प्रमुखांच्या अध्यक्षतेखाली प्रादेशिक निवड समित्या तसेच राज्यस्तरीय पदे भरण्याकरीता विभाग प्रमुखांच्या अध्यक्षतेखाली राज्यस्तरीय निवड समित्या कार्यरत आहेत. संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये राज्य शासनाच्या सर्व कार्यालयांतील तसेच राज्य शासनाच्या अधिपत्त्याखालील सर्व सार्वजनिक उपक्रम, मंडळे, महामंडळे, संचालनालये यांच्या कार्यालयातील पदभरती आणि स्थानिक स्वराज्य संस्थांमधील पदभरतीच्या परीक्षा "महापरीक्षा पोर्टल" मार्फत घेण्यात याव्यात असे सूचित करण्यात आले आहे.

महाराष्ट्रातील शेतकऱ्यांचे उत्पन्न दुप्पट करण्याकरिता त्यांना अत्यावश्यक नागरी सुविधा व ग्रामीण भागात आवश्यक त्या पायाभूत सुविधा पुरविण्याच्या अनुषंगाने कृषि व पदुम विभाग, ग्रामविकास विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, गृह विभाग, सार्वजनिक आरोग्य विभाग, मृदा व जलसंधारण विभाग, जलसंपदा विभाग या विभागांच्या नियंत्रणाखालील अनेक शासकीय कार्यालयातील रिक्त पदभरतीवरील निर्बंध संदर्भाधीन क्र.३ येथील शासन निर्णयान्वये उठविण्यात आले आहेत. त्यामुळे भूतपूर्व दुय्यम सेवा निवड मंडळांच्या कक्षेतील गट-क व गट-ब (अराजपत्रित) वर्गीय सरळसेवेची जी पदे

संदर्भाधीन क्र.३ येथील शासन निर्णयाच्या सूचीमध्ये अंतर्भूत करण्यात आलेली आहेत त्या पदांच्या भरतीसाठी मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय: -**

उपरोल्लेखित विभागांच्या अधिनस्त भूतपूर्व दुय्यम सेवा निवड मंडळांच्या कक्षेतील गट-क व गट-ब (अराजपत्रित) वर्गीय नामनिर्देशनाद्वारे भरावयाची जी रिक्त पदे वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र. ३ येथील, दि.१६/०५/२०१८ च्या शासन निर्णयातील सूचीमध्ये अंतर्भूत करण्यात आली आहेत त्या पदांच्या भरतीसाठी पुढीलप्रमाणे निर्देश देण्यात येत आहेत: -

१) सर्व संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी डिसेंबर २०१९ अखेरपर्यंतच्या संभाव्य रिक्त पदांची परिगणना करून त्यानुसार दि.१०/०७/२०१८ पर्यंत मागणीपत्र संबंधित निवडसमितीकडे पाठवावे.

२) नियुक्ती प्राधिकाऱ्यांकडून मागणीपत्रे प्राप्त झाल्यावर संबंधित निवडसमित्यांनी सदर मागणीपत्रांचे एकत्रीकरण करून दि.१७/०७/२०१८ पर्यंत जिल्हानिहाय/निवडसमितीनिहाय एकत्रित मागणीपत्र माहिती तंत्रज्ञान विभागांतर्गत स्थापित **"महापरीक्षा कक्ष"** यांचेकडे पाठवावे.

३) **"महापरीक्षा कक्षाने"** सदर पदभरतीच्या परीक्षांचे आयोजन संपूर्ण राज्यामध्ये प्रत्येक जिल्ह्याच्या ठिकाणी एकाच दिवशी, एकाच वेळी करण्याच्या दृष्टीने दिवस आणि वेळ निश्चित करावी व त्यानुसार सदर पदभरतीची जाहिरात दि.३१/०७/२०१८ पर्यंत प्रसिद्ध करावी. सदर पदभरतीस व्यापक प्रसिद्धी देण्याकरिता पदभरतीची जाहिरात प्रसिद्ध करताना संदर्भाधीन क्र. ४ येथील दि.१३/०६/२०१८ च्या शासन निर्णयाच्या परिच्छेद क्र. ४ येथील सुचनांचा अवलंब करावा.

४) जिल्हा परिषद संवर्गाच्या सर्व परीक्षा देखील वरीलप्रमाणे एकाच दिवशी घेण्याबाबत ग्रामविकास विभागाने योग्य ती कार्यवाही करावी.

५) सदर परीक्षांच्या प्रश्नपत्रिका तयार करताना **"महापरीक्षा कक्षाने"** सदर प्रश्नपत्रिकांमध्ये त्या त्या जिल्ह्यांशी संबंधित इतिहास, भूगोल व स्थानिक बाबी यासंदर्भात एकूण गुणांपैकी किमान २५% गुणांचे प्रश्न प्रश्नपत्रिकेमध्ये अंतर्भूत करावेत व संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णय व व क्र.२ येथील शासन परिपत्रकानुसार भरतीप्रक्रिया राबविण्यात यावी.

६) सदर पदभरतीप्रक्रिया राबविताना संबंधित नियुक्ती प्राधिकारी, संबंधित निवड समिती तसेच, माहिती तंत्रज्ञान विभागांतर्गत स्थापित महापरीक्षा कक्षाने पदभरतीसंदर्भातील संदर्भांकित क्र.१ ते ४ येथील शासन आदेशांतील सर्वसाधारण आदेश/सुचनांचे काटेकोर पालन करावे.

२. या शासन निर्णयात नमूद कार्यपद्धती केवळ संदर्भाधीन क्र.३ येथे नमूद शासन निर्णयातील पदभरतीसंदर्भात लागू राहील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०७०२१६०५३६८१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vilas Ramdas Thakur

Digitally signed by Vilas Ramdas Thakur
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMTD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, cn=Vilas Ramdas Thakur
Date: 2018.07.02 16:07:44 +05'30'

**( वि. रा. ठाकूर )**
उप सचिव,
महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२) मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३) सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४) मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, विधानभवन, मुंबई,
५) सर्व संसद सदस्य, विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य,
६) मुख्य सचिव,
७) सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
८) संचालक (माहिती व तंत्रज्ञान संचालनालय),
९) महापरीक्षा कक्ष (माहिती व तंत्रज्ञान संचालनालय), मंत्रालय, मुंबई,
१०) सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना), उप सचिव (सा. प्र. वि./का.३९) त्यांनी हे आदेश सर्व संबंधितांच्या निदर्शनास आणावेत.
११) प्रबंधक, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
१२) प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
१३) प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
१४) प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
१५) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१६) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा) मुंबई,
१७) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधान परिषद) मुंबई,
१८) राज्य निवडणूक आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
१९) सचिव, राज्य माहिती आयोग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई,
२०) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई,
२१) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई,
२२) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, नागपूर,

२३) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, नागपूर,
२४) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (प्रसिध्दीकरिता ५ प्रती)
२५) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, मुंबई ४०० ०३२ (१० प्रती)
२६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
२८) मुख्य लेखापरीक्षक (निवासी लेखे), कोंकण भवन, नवी मुंबई,
२९) सर्व विभागीय आयुक्त,
३०) सर्व जिल्हाधिकारी,
३१) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
३२) बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई १ (५ प्रती)
३३) भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, नरीमन पॉईंट, मुंबई २० (५ प्रती)
३४) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, एस. व्ही.पटेल रोड, मुंबई ४ (५ प्रती)
३५) भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, वरळी, मुंबई १३(५ प्रती)
३६) इंडियन नॅशनल कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस समिती, टिळक भवन, मुंबई २५ (५ प्रती)
३७) नॅशनलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, नरीमन पॉईंट, मुंबई २१ (५ प्रती)
३८) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई २८ (५ प्रती)
३९) सर्व मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभागप्रमुख/ प्रादेशिक विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख
४०) मंत्रालय मध्यवर्ती ग्रंथालय, मंत्रालय, मुंबई (२ प्रती)
४१) सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,

*पत्राने